**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१-अ) स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. राजस २०१४/ प्र.क्र.३५७/ ५ स,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक :- १२ जून, २०१५

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१/१/२०१४

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.२०/५/२०१४

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.१९/१/२०१५

४) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंधक अधिनियम २००५

५) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.राजस २०१४/प्र.क्र.३५७/५-स,दि.३१/१२/२०१४

६) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.राजस २०१४/प्र.क्र.३५/५-स, दि.२/५/२०१५

७) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन शुध्दीपत्रक राजस २०१४/प्र.क्र.३५/५-स, दि.१९/५/२०१५

८) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन शुध्दीपत्रक राजस २०१४/प्र.क्र.३५७/५-स,दि.२७/५/२०१५

**प्रस्तावना :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि.३१/१०/२०१३ रोजी दिलेल्या निदेशास अनुसरुन शासनाने गट-अ, गट-ब व गट-क या संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना/बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबतचा निर्णय संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार या विभागाच्या दिनांक २/५/२०१५ च्या शासन निर्णयान्वये व दिनांक १९/५/२०१५ च्या शुध्दीपत्रकान्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील गट-अ व

गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात आले आहे. तदनंतर दिनांक २७/५/२०१५ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये सहाय्यक निबंधक/विशेष लेखापरिक्षक वर्ग-२/सहाय्यक संचालक (गट-ब) या संवर्गातील अधिका-यांचे बदली अधिकार सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे प्रत्यार्पित करण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने गट-ब संवर्गातील अधिका-यांची पदस्थापना/ बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील क्षेत्रीय अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१-अ) ची खालीलप्रमाणे स्थापना करण्यात येत आहे.

**नागरी सेवा मंडळ (१-अ)**

| | | |
|---|---|---|
| १ | अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुख्यालय, पुणे | अध्यक्ष |
| २ | अपर निबंधक,सहकारी संस्था (प्रशासन), महाराष्ट्र राज्य, मुख्यालय, पुणे | सदस्य |
| ३ | अपर निबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण), महाराष्ट्र राज्य, मुख्यालय, पुणे | सदस्य |

उपरोक्त नागरी सेवा मंडळ (१-अ) प्रस्तुत शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१२१७३६१५०००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijaykumar Vishnu Dapake

Digitally signed by Vijaykumar Vishnu Dapake
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijaykumar Vishnu Dapake
Date: 2015.06.12 17:37:53 +05'30'

( वि. वि. दपके )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव

४) मा.राज्यमंत्री (सहकार/पणन /वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव

५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

६) अपर मुख्य सचिव (पणन/वस्त्रोद्योग), प्रधान सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई

७) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

९) कक्ष अधिकारी (१२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.मंत्रालय, मुंबई

१०) निवड नस्ती.